**आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांकडून प्रवेशाच्या वेळी १००% शिक्षण शुल्क घेतलेल्या विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्काची ५० टक्के रक्कम शिक्षण संस्थांनी तात्काळ विद्यार्थ्यास परत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्र. ईबीसी-२०१८/प्र.क्र.३८/तांशि-४**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०६ सप्टेंबर, २०१८

वाचा :- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्र.ईबीसी-२०१८/ प्र.क्र.३८/तांशि-४, दिनांक ७ ऑक्टोबर,२०१७

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्र.ईबीसी-२०१८/ प्र.क्र.३८/तांशि-४, दिनांक १४ फेब्रुवारी,२०१८

३) शासन पत्र क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२३७/तांशि-४, दिनांक २०/६/२०१८

४) मा.मंत्री, महसूल यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक २८/८/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेले निर्णय.

**प्रस्तावना :**

वर नमूद दिनांक ७ ऑक्टोबर,२०१७ च्या शासन निर्णयान्वये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील पात्र विद्यार्थ्यांना राजिर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून लागू करण्यात आली होती. शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून या योजनेंतर्गत उत्पन्नाची मर्यादा रुपये ८.०० लक्ष इतकी करण्यात आली आहे. त्यामुळे या योजनेचा लाभ मिळणाऱ्या विद्यार्थ्यांकडून संस्थांनी प्रवेशाच्यावेळी १०० टक्के शिक्षण शुल्क आकारु नये याबाबत वेळोवेळी सूचना दिलेल्या आहेत. तथापि, शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये काही संस्थांनी विद्यार्थ्यांकडून १०० टक्के शिक्षण शुल्क आकारले असल्याची माहिती शासनाकडे प्राप्त झालेली आहे. या योजनेंतर्गत पात्र विद्यार्थ्यांना देय शिक्षण शुल्काच्या रक्कमेपैकी पहिल्या हप्त्याची रक्कम लाभार्थी विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात ऑक्टोबर, २०१८ मध्ये जमा करण्यात येणार आहे.

**परिपत्रक :**

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी पात्र असलेल्या विद्यार्थ्यांकडून प्रवेशाच्यावेळी १०० टक्के शुल्काची रक्कम संस्थांनी घेतली असल्यास ही रक्कम तात्काळ विद्यार्थ्यास परत करण्यात यावी.

२. वरील आदेश सर्व शिक्षण संस्थांच्या निदर्शनास आणण्यात यावेत.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९०६१५१८१२६३०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.09.06 16:50:35 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
३. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. आयुक्त, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालये
८. सर्व सहसंचालक, कला संचालनालय विभागीय कार्यालये
९. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सर्व कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी,
१३. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव,
१४. निवड नस्ती (तांशि-४).